**ज्येष्ठ विधिज्ञ ॲड. राजा ठाकरे यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत.**

**बंडगार्डन पो. ठा., पुणे येथे दाखल गु.र.क्र. ८३/२०१० (गु. र. क्र. ०६/२०१० दहशतवाद विरोधी पथक, पुणे), या गुन्हयातून उद्भवणाऱ्या न्याय प्रकरणी मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली येथे दाखल याचिकेच्या न्यायालयीन कामकाजासाठी.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एसपीपी-०९२२/प्र.क्र.१७५/पोल-१०**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक: ०६ एप्रिल, २०२३

**संदर्भ** :- (१) विधि व न्याय विभाग, शासन पत्र क्र. ५२/२१३२/एसपीपी/२०२२, दि. १४.११.२०२२
(२) वित्त विभाग,शासन निर्णय क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम,दि. २९.०७.२०१५
(३) वित्त विभाग,शासन निर्णय क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम,दि. १६.०६.२०१७

**शासन निर्णय**:-

बंडगार्डन पो. ठा., पुणे येथे दाखल गु.र.क्र. ८३/२०१० (गु. र. क्र. ०६/२०१० दहशतवाद विरोधी पथक), या गुन्हयातून उद्भवणाऱ्या न्याय प्रकरणी मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली येथे दाखल याचिकेच्या अनुषंगाने विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून काम पाहण्यासाठी ज्येष्ठ विधिज्ञ राजा ठाकरे त्यांना खालीलप्रमाणे व्यावसायिक फी अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली**

अ) प्रतिदिन सुनावणी फी - ३,००,०००/- (रुपये तीन लाख फक्त)
ब) विचारविनिमय फी/ प्रतितास /तासाचा भाग) - ५०,०००/- (रुपये पन्नास हजार फक्त)

सदर फी व्यतिरिक्त अन्य कोणतेही लाभ ज्येष्ठ विधिज्ञ राजा ठाकरे यांना अनुज्ञेय होणार नाहीत. तसेच त्यांना कोणत्याही अपरिणामकारक सुनावणीकरीता फीचे प्रदान करण्यात येणार नाही.

२. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधित प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्याकडून तसेच संबंधित मा. न्यायालयाच्या प्रबंधकाकडून तपासून, प्रमाणित करून घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता संबंधित पोलीस उपायुक्त यांनी घ्यावी.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या " मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस-(००)(१०१), गुन्हा अन्वेषण आणि दक्षता (००) (०५), दहशतवाद विरोधी पथक (२०५५ ०५७१) (योजनेत्तर/ दत्तमत) व्यावसायिक व विशेष सेवा" या लेखाशीर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतुदीच्या उपलब्धतेच्या अधीन आणि मंजूर अनुदानातून व मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

४. प्रस्तुत शासन निर्णय संदर्भ क्र. २ व ३ वरील वित्त विभाग शासन निर्णयानुसार मा. सर्वोच्च न्यायालयात न्यायालयीन प्रकरणी नेमण्यात आलेल्या विशेष सरकारी अभियोक्त्यांना फी अदा करण्यासंदर्भात प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०४१०१२४३५५२०२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KAILAS ARJUN GAIKWAD

Digitally signed by KAILAS ARJUN GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=b31abfcb1894c4c597cc944f19a89f474e7b98a708cc03eb46cd241a604d42bb, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=47D160717AE29C2D2661B5275D8B9B4CFAE93893BE65A27853145A4C04D865CD, cn=KAILAS ARJUN GAIKWAD
Date: 2023.04.10 12:49:10 +05'30'

**( कैलास गायकवाड )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत:-**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. अपर पोलीस महासंचालक, दहशतवाद विरोधी पथक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. वरीष्ठ पोलीस निरिक्षक, बंडगार्डन पो. ठा., पुणे.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) महाराष्ट्र १/२ , मुंबई/नागपूर
५. जिल्हा लेखा अधिकारी, पुणे
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, पुणे
७. ॲड. राजा ठाकरे, ३०१, मारुती मॅन्शन , १७, रघुनाथ दादाजी स्ट्रिट, फोर्ट, मुंबई- ४००००१
८. विधी व न्याय विभाग (अ शाखा), मंत्रालय, मुंबई.
९. निवड नस्ती (पोल-१०).